**शासन सेवेत तदर्थ (Adhoc)/अस्थायी नियुक्ती करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना रजा.**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

शासन निर्णय क्र. अरजा-२४९६/१४/सेवा-९,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ मार्च १९९७

## शासन निर्णय

सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाप्रमाणे शासन सेवेतील पदावर महाराष्ट्र लोकसेवा आयोग व राज्य निवड मंडळ या अभिकरणांमार्फत उमेदवार नियुक्त करण्यात येतात. तथापि, सदरहू अभिकरणांमार्फत उमेदवार उपलब्ध होईपर्यंतच्या कालावधीत कार्यालयीन कामाची गैरसोय होऊ नये म्हणून राजपत्रित संवर्गातील पदांवर एक वर्ष व लिपिक-टंकलेखक इत्यादी संवर्गातील पदांवर तीन महिने एवढ्या कालावधीपर्यंत, विहित सेवा प्रवेश नियमानुसार तदर्थ/अस्थायी नेमणुका करण्याच्या सूचना शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक एसआरव्ही. १०८७/२००/प्र. क्र. ३/८७/बारा, दिनांक ८ ऑक्टोबर १९९० व क्रमांक एसआरव्ही. १०९२/प्र. क्र. ५/बारा, दिनांक २९ जुलै १९९२ अन्वये देण्यात आल्या आहेत. अल्प कालावधीकरिता करण्यात आलेल्या तदर्थ/अस्थायी नेमणुका क्वचित प्रसंगी व अपरिहार्य कारणास्तव विहित कालावधीनंतरही पुढे चालू ठेवण्यात येतात. अशा तदर्थ/अस्थायी नेमणुका ह्या नियमित नसल्यामुळे संबंधित कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ हे नियम लागू होत नाहीत. अशा कर्मचाऱ्यांची नियुक्ती ठराविक कालावधीपुरती मर्यादित असल्याने त्यांना शासन सेवेतील नियमित कर्मचाऱ्यांप्रमाणे सर्व प्रकारच्या रजेसाठी पात्र ठरविणेही उचित ठरत नाही. म्हणून त्यांना काही रजाविषयक लाभ देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

२. या संदर्भात सर्वंकष विचार करुन तदर्थ/अस्थायी कर्मचाऱ्यांना खाली निर्देशिल्याप्रमाणे रजा मंजूर करण्याचा निर्णय शासनाने आता घेतला आहे.

**दीर्घ सुटी विभागाव्यतिरिक्त अन्य विभागाच्या सेवेतील कर्मचारी**

(अ) ज्या कर्मचाऱ्यांची नियुक्ती विहित अभिकरणांमार्फत करण्यात आलेली असून निव्वळ तांत्रिक कारणास्तव "तदर्थ/अस्थायी" म्हणून समजण्यात आली असेल (उदा. न्यायालयाच्या आदेशानुसार नियमित नियुक्त करणे शक्य होत नाही) अशा कर्मचाऱ्यांना, नियमित अस्थायी (महाराष्ट्र लोकसेवा आयोग/निवड मंडळ पुरस्कृत) कर्मचाऱ्यांप्रमाणे, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार रजा अनुज्ञेय होईल.

(ब) उपरोक्त (अ) येथे नमूद केलेल्या कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त इतर तदर्थ/अस्थायी कर्मचाऱ्यांना खालील शर्तींच्या अधीन राहून रजा मंजूर करण्यात यावी.

(१) संबंधित कर्मचाऱ्याने पूर्ण केलेल्या सेवेकरिता दरमहा २½ दिवस याप्रमाणे अर्जित रजा देण्यात यावी.

(२) रजा मंजूर करताना ती पूर्ण दिवसांमध्ये मंजूर करण्यात यावी.

(३) सेवेत असताना/सेवा समाप्तीनंतर यथास्थिती अर्जित रजा प्रत्यर्पित करण्याची/शिल्लक अर्जित रजेचे रोखीकरण करण्याची मुभा दिली जाणार नाही.

(४) तदर्थ/अस्थायी म्हणून करण्यात आलेली नेमणूक अपरिहार्य कारणास्तव तीन वर्षांच्या पलीकडे सलग चालू ठेवण्यात आलेली असेल तर अशा कर्मचाऱ्यांना, त्यांच्या नियुक्तीच्या सुरुवातीच्या दिवांकापासून म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार नियमित अस्थायी कर्मचाऱ्यांप्रमाणे सर्व प्रकारच्या रजेचे लाभ देण्यात यावेत.

**दीर्घ सुटी विभागाच्या सेवेतील कर्मचारी**

(अ) दीर्घ सुटी विभागातील कर्मचारी म्हणून नियुक्ती करण्यात आलेले तदर्थ/अस्थायी-शिक्षक/प्राचार्य/मुख्याध्यापक/ग्रंथपाल/प्रयोगशाळा सहाय्यक/पहारेकरी आणि इतर कर्मचारी यांची नियुक्ती विहित अभिकरणांमार्फत करण्यात आलेली असून निव्वळ तांत्रिक कारणास्तव "तदर्थ/अस्थायी" म्हणून समजण्यात आली असेल तर अशा कर्मचाऱ्यांना दीर्घ सुटी विभागातील तत्सम नियमित अस्थायी कर्मचाऱ्यांप्रमाणे म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार रजा देण्यात यावी.

(ब) उपरोक्त (अ) येथे उल्लेखिलेल्या कर्मचाऱ्याखेरीज इतर कर्मचाऱ्यांपैकी—

(१) ज्या कर्मचाऱ्यांना दीर्घ सुटीचा लाभ व त्याकरिता नियमित वेतन व भत्ते/रजा वेतन देण्यात येते अशा कर्मचाऱ्यांना रजा अनुज्ञेय नाही.

(शा.म.मु.) एच ५२४९ (१४०१०—४-९७)

(२) ज्या कर्मचाऱ्यांना दीर्घ सुटीचा लाभ देण्यात येत नाही अशा कर्मचाऱ्यांना त्यांनी पूर्ण केलेल्या सेवेकरिता दरमहा २½ दिवस याप्रमाणे खालील शर्तींच्या अधीन राहून अर्जित रजा देण्यात यावी :—

(i) दीर्घ सुटीच्या कालावधीत संबंधित कर्मचाऱ्यांची सेवा संबंधित प्रशासनाकडून वापरण्यात आलेली असावी.

(ii) कोणत्याही कारणास्तव संबंधित कर्मचाऱ्यांची सेवा दीर्घ सुटीच्या कालावधीत वापरण्यात येणार नसेल तर दीर्घ सुटीचा कालावधी सुरू होण्यापूर्वी त्यांची सेवा समाप्त करण्यात आलेली असावी.

(iii) रजा पूर्ण दिवसांमध्ये मंजूर करण्यात यावी.

(iv) सेवेत असताना/सेवा समाप्तीनंतर यथास्थिती अर्जित रजा प्रत्यर्पित करण्याची/शिल्लक अर्जित रजेचे रोखीकरण करण्याची मुभा दिली जाणार नाही.

(v) तदर्थ/अस्थायी म्हणून करण्यात आलेली नेमणूक अपरिहार्य कारणास्तव तीन वर्षांच्या पलीकडेही सलग चालू ठेवण्यात आलेली असेल तर अशा कर्मचाऱ्यांना त्यांच्या नियुक्तीच्या सुरुवातीच्या दिनांकापासून, म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील तरतुदीनुसार तत्सम नियमित अस्थायी कर्मचाऱ्यांप्रमाणे सर्व प्रकारच्या रजेचे लाभ देण्यात यावेत.

३. हे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून अंमलात येतील. या दिनांकापूर्वी तदर्थ/अस्थायी म्हणून नियुक्त करण्यात आलेल्या व या दिनांकानंतरही सेवेत कार्यरत असलेल्या कर्मचाऱ्यांच्या प्रकरणीदेखील हे आदेश लागू राहतील. तथापि, सदरहू आदेश अंमलात येण्यापूर्वी ज्या तदर्थ/अस्थायी कर्मचाऱ्यांची सेवा समाप्त करण्यात आलेली आहे, अशा कर्मचाऱ्यांची रजा कोणत्याही प्रकारे निकालात काढण्यात आलेली प्रकरणे पुनश्च उघडण्यात येऊ नयेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**बि. अ. देशपांडे,**
**शासनाचे उप सचिव.**

**प्रत :—**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
उप संचालक, लेखा व कोषागारे, पुणे/नाशिक/औरंगाबाद/नागपूर,
उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभागांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव/उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे-१,
नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, मुक्काम-पोस्ट राहुरी, जिल्हा अहमदनगर,
नियंत्रक, कोकण कृषि विद्यापीठ, मुक्काम-पोस्ट दापोली, जिल्हा रत्नागिरी,
नियंत्रक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी,
नियंत्रक, पंजाबराव कृषि विद्यापीठ, अकोला,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-९.

*पत्राद्वारे